राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग अंतर्गत जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंचाच्या प्रबंधक गट-ब (राजपत्रित) पदावर तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन आदेश क्रमांक -ग्रासंअ-२०२४/प्र. क्र. ८/ग्रा.सं.४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ०३ मार्च, २०२५.

**शासन आदेश:-**

अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखालील राज्य आयोगाच्या अखत्यारितील सन २०२३-२४ या निवडसूची वर्षात अधीक्षक / शिरस्तेदार / जनसंपर्क अधिकारी (वेतनश्रेणी एस-१४, रु.३८६००-१२२८६०) या संवर्गातून प्रबंधक, गट-ब (राजपत्रित) (वेतनश्रेणी एस-१५, रु.४१८००-१३२३००) या पदावर या आदेशाद्वारे विहित अटींच्या अधिनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ -४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या ठिकाणी या आदेशाच्या दिनांकापासून करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिकाऱ्यांचे नाव | वाटप विभाग | नागरी सेवा मंडळाची शिफारस |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. क. रा. तुमसरे | नागपूर | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, गडचिरोली. |
| २. | श्री. भु. स. पंचभाई | नाशिक | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, नाशिक. |
| ३. | श्री. वि. सुं. चौहान | अमरावती | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, अकोला. |
| ४. | श्री. अ.शा. जेवळीकर | पुणे | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, कोल्हापूर. |
| ५. | श्री. सु. पां. कोटूरवार | छत्रपती संभाजीनगर | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, छत्रपती संभाजीनगर. |
| ६. | श्री. सं. व. गिरी | कोकण-२ | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई उपनगर. |
| ७. | श्रीमती सु.न.रघतवान | पुणे | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, पुणे. |
| ८. | श्री. अ. रु. ठेवरे | छत्रपती संभाजीनगर | जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग, परभणी. |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. त्यानुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि. २५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग / १६-ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार सदर पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच पुढील अटीच्या अधीन राहून संबंधीत अधीक्षक / शिरस्तेदार / जनसंपर्क अधिकारी यांना प्रबंधक, गट-ब (राजपत्रित) या संवर्गात खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे:-

१) सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरती पदोन्नती राहील.

२) सदर पदोन्नत्या, सद्य:स्थितीत अधीक्षक / शिरस्तेदार / जनसंपर्क अधिकारी राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग या पदाच्या ज्येष्ठता यादीबाबत कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही, तसेच या ज्येष्ठता यादीस आव्हानित देखील करण्यात आलेले नाही ही वस्तुस्थिती विचारात घेऊन केवळ तात्पुरत्या स्वरूपात देण्यात येत असून सदर पदावर संबंधीत अधिकाऱ्यांचा कायमस्वरूपी धारणाधिकार राहणार नाही.

३) सन २०२३-२४ या निवडसूची वर्षाकरीता पात्र अधीक्षक / शिरस्तेदार / जनसंपर्क अधिकारी यांची प्रबंधक, गट-ब (राजपत्रित), राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग पदावरील पदोन्नती तात्पुरती असल्याने निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमित पदाचा व सेवा ज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४) सदर पदोन्नत्या तात्पुरत्या स्वरूपाच्या असून त्या केवळ पदोन्नत कोट्यात उपलब्ध होणाऱ्या पदांनुसार नियमित करण्यात येतील.

५) पदोन्नत होणारे अधिकारी पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू न झाल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.३०३/ का.१२, दि.१२.०९.२०१६ अन्वये कार्यवाही करण्यात येईल.

६) सदर पदोन्नती ही संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरू झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

७) हे आदेश तात्काळ अंमलात येतील. प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग यांनी वर नमूद अधिका-यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे व पदोन्नतीच्या पदावर रुजु करुन घेवून त्याबाबतचा रुजू अहवाल cp4.mhpds.gov.in या ई-मेलवर शासनास पाठवावा.

३. सदरचे पद गट- ब (राजपत्रित) संवर्गातील पद असल्याने सदर अधिकारी यांना महसूल विभाग वाटप अधिसूचना दि.१४.०७.२०२१ मधील तरतुदींनुसार महसूल विभागाचे वाटप करुन त्यानुसार पदस्थापना देण्यात आली आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०३०३१५५९५८७३०६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJANAN RAMDAS DESHMUKH

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=09c74e56a555b1257e71176f4c700164528f1b5b3ff73c027668f5ff29c069da, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DEE8A196FB0BB879933A88F87075CC443D363994879D49E0C1BA541465369700, cn=GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2025.03.03 16:02:05 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधीत प्रबंधक (राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांच्यामार्फत)

**प्रत :-**

१. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. मा. अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, महाराष्ट्र, मुंबई.
५. प्रबंधक (प्रशासन/विधी) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
६. महालेखापाल-१ ( लेखा परिक्षा ) / ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. महालेखापाल-२ ( लेखा परिक्षा) / ( लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांच्यामार्फत)
१०. सर्व प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग.
११. उप सचिव(ग्रासं-४), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती, कार्यासन ग्रा.सं.४.